**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः कअनि १११९/प्र.क्र.७/१४ब**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: २५ ऑक्टोबर, २०१९

**संदर्भ :**
१) सा.प्र.वि. शासन आदेश क्र. कअनि-१११६/प्र.क्र.११/भाग-१/१४ ब., दिनांक २७.०५.२०१६
२) सा.प्र.वि.शासन आदेश क्र. कअनि-१११६/प्र.क्र.११/भाग-१/१४ ब., दिनांक २८.०८.२०१८
३) अ.मु.स., शालेय शिक्षण व क्रिडा विभाग यांची अदिनांकित टिप्पणी.
४) सा.प्र.वि.शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र.१८६/१६/कार्या-१४, दिनांक २३.१२.२०१६

## शासन आदेश

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील मधील कलम ४ (१) (२) (३) नुसार संदर्भाधीन क्रमांक १ येथील आदेशान्वये श्री.गोविंद बा. कांबळे, कक्ष अधिकारी, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग यांची जलसंपदा विभागात बदली करण्यात आली आहे.

२. श्री.गो.बा.कांबळे, कक्ष अधिकारी, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग यांना जलसंपदा विभागात रुजू होण्यासाठी दिनांक ०१.११.२०१९ (म.पू.) पासून एकतर्फी कार्यमुक्त करण्यात येत आहे. श्री.कांबळे, कक्ष अधिकारी यांनी इतर कोणत्याही आदेशाची प्रतिक्षा न करता जलसंपदा विभागात दिनांक ०१.११.२०१९ (म.पू.) पासून रुजू व्हावे. सदरचे आदेश हेच कार्यमुक्ततेचे आदेश असून शालेय शिक्षण व क्रिडा विभागाने स्वतंत्र आदेश निर्गमित करण्याची आवश्यकता नाही.

३. म.ना.से.(पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम १९८१ चे नियम १२ मधील तरतूदीनुसार श्री.कांबळे, कक्ष अधिकारी यांना पदग्रहण अवधी अनुज्ञेय नसल्याने, ते दिनांक ०१.११.२०१९ (म.पू.) रोजी जलसंपदा विभागात रुजू झाले नाहीत तर त्यांचा त्यापुढील कालावधी अनुपस्थितीचा कालावधी समजण्यात येऊन त्यांच्या विरुध्द शिस्तभंगविषयक कार्यवाही प्रस्ताविण्यात येईल.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९१०२५१४१६१०९३०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Gajanan
Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2019.10.25 16:58:46 +05'30'

**( ग. भि. गुरव )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्री.गो.बा.कांबळे, कक्ष अधिकारी (संबंधित मंत्रालयीन विभागामार्फत)

**प्रत,**

१) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
२) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (आस्थापना), संबंधित मंत्रालयीन विभाग,
३) सह/उप सचिव (आस्थापना), संबंधित मंत्रालयीन विभाग,
४) संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, ठाकरसी हाऊस, बॅलार्ड पिअर, सुरजी वल्लभदास रोड, मुंबई-४०००१.
५) आहरण व संवितरण अधिकारी, संबंधित मंत्रालयीन विभाग,
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७) निवड नस्ती- साप्रवि १४-ब